**वीज निर्मितीचा खर्च कमी करण्याच्या दृष्टीने देशांतर्गत कोळसा वापरामध्ये लवचिकता आणणे तसेच इतर उपाययोजना करणेसाठी नोडल एजन्सी नियुक्त करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : केंद्रीय-२०१७/प्र.क्र.७२/ऊर्जा-४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ मे, २०१७

**संदर्भ** : १. केंद्र शासनाच्या केंद्रीय विद्युत प्राधिकरण यांचे पत्र क्रमांक CEA/Plg /FM/१/३७/२०१६/७७९-८३६, दिनांक ०८.०६.२०१६
२. केंद्र शासनाच्या विद्युत मंत्रालयाचे पत्र क्रमांक सं. ५/३/२०१५-ओएम, दिनांक २०.०२.२०१७

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक ०८.०६.२०१६ च्या पत्रान्वये वीज निर्मितीचा खर्च कमी करण्याच्या दृष्टीने देशांतर्गत कोळसा वापरामध्ये लवचिकता आणणे तसेच इतर उपाययोजना करण्यासाठी अवलंबावयाच्या कार्यपद्धतीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर मार्गदर्शक सूचनांमधील अ.क्र. २० येथील तरतुदीनुसार Case - ४ मध्ये राज्य व केंद्र शासनाच्या वीज निर्मिती कंपन्यांच्या खाजगी वीज निर्मिती केंद्रांमध्ये (Independent Power Producers IPPs) कोळसा वापराबाबत लवचिकता आणण्याबाबत स्वतंत्र मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत असल्याचे नमूद करण्यात आले आहे. त्यानुषंगाने, उपरोक्त संदर्भ क्रमांक २ अन्वये केंद्र शासनाच्या विद्युत मंत्रालयाच्या दिनांक २०.०२.२०१७ च्या पत्रान्वये सविस्तर कार्यपद्धतीबाबत (Methodology for Use of Coal by State in Private Generating Stations IPPs) आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सदर कार्यपद्धतीमधील General Principles मध्ये अ. क्र. (vi) येथे नमूद तरतुदीनुसार सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्य शासनांनी त्यांच्या राज्यात एक मध्यवर्ती संस्था (Nodal Agency) नेमण्याबाबत तरतूद करण्यात आलेली आहे. सदर कार्यपद्धतीची काटेकोर अंमलबजावणी करण्यासाठी शासनातर्फे एक मध्यवर्ती संस्था (Nodal Agency) नियुक्त करणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाच्या संदर्भ क्रमांक २ येथील पत्रासोबत निर्गमित करण्यात आलेल्या कार्यपद्धती मधील General Principles मध्ये अ. क्र. (vi) येथील तरतुदीनुसार राज्य व केंद्र शासनाच्या वीज निर्मिती कंपन्यांच्या स्वतंत्र वीज निर्मिती केंद्रांमध्ये (Independent Power Producers IPPs) कोळसा वापराबाबत लवचिकता आणण्याच्या कार्यपद्धतीची अंमलबजावणी करण्यासाठी एक मध्यवर्ती संस्था (Nodal Agency) नियुक्त करावी अशा केंद्र शासनाच्या सूचना आहेत. त्यानुषंगाने महाराष्ट्र राज्याकरिता केंद्र शासनाच्या Independent Power Producers साठी कोळसा वापराबाबतच्या कार्यपध्द्तीची राज्यात काटेकोर अंमलबजावणी करण्यासाठी “महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.” या कंपनीची मध्यवर्ती संस्था (Nodal Agency) म्हणून नियुक्त करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र विद्युत निर्मिती कंपनी मर्या., (महानिर्मिती) या कंपनीने या शासननिर्णयाच्या दिनांकापासून उपरोक्त प्रयोजनासाठी मध्यवर्ती संस्था (Nodal Agency) म्हणून,केंद्र शासनाच्या संदर्भाधीन पत्रांन्वये निर्गमित करण्यात आलेल्या कार्यपध्दतीमधील मार्गदर्शक सूचनांचे तसेच केंद्र शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करण्याची व राज्यात सदर सूचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या. या कंपनीची राहील. तसेच याबाबत महानिर्मिती कंपनीने दरवर्षी आढावा घेऊन शासनास सविस्तर अहवाल सादर करावा.

३. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५१५१३४२५४३३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2017.05.15 13:45:46 +05'30'

**( भि.य. मंता )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कं. मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कं.मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कं. मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सुत्रधारकंपनीमर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
१०. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने
११. मंत्रालयीन सर्व विभाग
१२. निवड नस्ती.